राज्यात ई-चलान प्रकल्प राबविण्यासाठी सल्लागार म्हणून नियुक्त केलेल्या मे. केपीएमजी कंपनीस दि.१.०४.२०१९ ते ३०.०४.२०२० या कालावधीकरीता केलेल्या कामाचे देयक अदा करणेबाबत...

महाराष्ट्र शासन
गृह विभाग
शासन निर्णय क्रमांकः सीसीटी -३६१९/प्र.क्र.३६/भाग-१/पोल-३
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, २ रा मजला, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक : २०.१०.२०२०

वाचा:

१. माहिती व तंत्रज्ञान संचालनालय ,शासन निर्णय क्रमांक : GAD-मातंस ०८०/४/२०१४-O/O DIRECTORATE OF IT-DIT (MH), दिनांक: ०१.०७.२०१४ ,दि. २०.०३.२०१८ व दि.०९.०५.२०१९.
२. गृह विभाग,शासन निर्णय क्रमांक गृहआ-२०१५/प्र.क्र.२३०/आस्थापना-२, दि.२०.५.२०१५.
३. अपर मुख्य सचिव (गृह) यांच्या अध्यक्षतेखालील प्रकल्प अंमलबजावणी समितीच्या दि.२३.८.२०१६ रोजीच्या बैठकीचे इतिवृत्त.
४. गृह विभाग,कार्यादेश क्रमांक टीआरए/१२१३/प्र.क्र.९/शिकाना/पोल-८, दि.६.९.२०१६.
५. गृह विभाग शासन निर्णय क्र-३६१९प्र.क्र.३६/पोल-३ दि.०७.०८.२०१९.
६. मे. केपीएमजी कंपनी प्रा.ली यांचा दि.०७.०१.२० रोजीचा ई-मेल.
७. मे.केपीएमजी प्रा.लि यांचे देयक दि.११.०६.२०२०
८. अपर पोलीस महासंचालक यांचे पत्र O.W.No.ADGP(Tr.)/४४/Reader/e-challan/२११८/२०२०. दि.२३.०७.२०२०.

प्रस्तावना

गृह विभागांतर्गत ई-गव्हर्नन्स प्रकल्प राबविण्यासंदर्भात विविध निर्णय घेण्यासाठी गृह विभाग शासन निर्णय दि. २०.०५.२०१५ अन्वये प्रकल्प अंमलबजावणी समिती (PIC) स्थापन करण्यात आली आहे. सदर समितीच्या दि. २३.८.२०१६ रोजीच्या बैठकीमध्ये मे.केपीएमजी या कंपनीची राज्यात ई-चलान प्रकल्प राबविण्यासाठी प्रकल्प सल्लगार म्हणून नेमणुक करण्यात आली आहे. त्यानुसार दि. ०६.०९.२०१६ रोजीच्या कार्यादेशान्वये ई-चलान प्रकल्पाचा पहिला टप्पा कार्यान्वित करण्यासाठी मे. केपीएमजी कंपनीच्या एक

प्रमुख सल्लागार अर्धवेळ, तीन वरीष्ठ सल्लागार पुर्णवेळ व दोन सल्लागार पुर्णवेळ तत्वावर याप्रमाणे दि. १०.९.२०१६ ते ०९.०२.२०१७ या कालावधीसाठी मानधन अनुज्ञेय करण्यात आले आहे. तसेच संदर्भाधीन क्र.५ येथील शासन निर्णयानुसार मे.केपीएमजी सल्लागार कंपनीला दि.०१.०४.२०१९ ते दि.३०.०९.२०१९ पर्यंत मे.केपीएमजी कंपनीच्या दोन वरिष्ठ सल्लगारांना तसेच दि.०१.१०.२०१९ ते ३०.०९.२०२० पर्यंत एका वरिष्ठ सल्लागारांना मुदतवाढ देण्यात आली आहे. त्यानुसार मे. केपीएमजी कंपनीने राज्यातील ई-चलान प्रकल्पासाठी सद्यस्थितीत केलेल्या कामानुसार सदर कंपनीला दि. ०१.०४.२०१९ ते दि. ३०.०४.२०२० या कालावधीची देयके अदा करण्याची बाब विचाराधीन होती. त्यानुषंगाने शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय**

ई-चलान प्रकल्पासाठी मे.केपीएमजी कंपनीने दि. ०१.०४.२०१९ ते दि.३०.०४.२०२० या कालावधीसाठी पाहिलेल्या सल्लागारांच्या कामासाठी रु.६१,१६,६९५/- (रुपये एकसष्ठ लाख सोळा हजार सहाशे पंच्यान्नव ) एवढ्या रकमेची देयके मे.केपीएमजी कंपनीस अदा करण्यास मंजूरी देण्यात येत आहे. सदर देयकांचा सविस्तर तपशिल खालीलप्रमाणे आहे:-

| Sr. No. | Resource Name | Role | Period | Man months | Rate | Total Amount |
|---|---|---|---|---|---|---|
| 1 | Mitesh Shah | Senior Consultant | 1st April 2019 to 30 th September 2019 | 6 | 2,77,200 | 16,63,200/- |
| 2 | Raksha Pai | Senior Consultant | 1st April 2019 to 30th April 2020 | 13 | 2,77,200 | 35,20,440/- (83,160) |
| | | | | | <br>CGST9%<br>SGST9% | 51,83,640/-<br>4,66,527.5<br>4,66,527.5 |
| | | | | | Total | 61,16,695/- |

**टीप:-**

अ) सदर रकमा या संदर्भात उपरोक्त नमुद शासन निर्णय क्र. १ अन्वये निश्चित केल्यानुसार ई-चलान प्रकल्पासाठी सल्लागारांना दरमहिना दरमाणुस (Man-Month) तत्वानुसार अदा करण्यात येत आहे.

ब) उपरोक्त शासन निर्णय संदर्भ क्र. १ नुसार सल्लागारांच्या मानधनावर होणा-या खर्चाच्या ५ % च्या प्रमाणात प्रवास,भोजन व निवास इत्यादी खर्च अनुज्ञेय करण्यात आला आहे.

क) संदर्भ क्र. ६ अन्वये मे. केपीएमजी कंपनीने सादर केलेल्या देयकानुसार सदर रकमा अदा करण्यात येत आहेत. सदर रकमामध्ये दिनांक दि. १०.०२.२०१७ ते दि. १०.०३.२०१९ या कालावधीसाठी १८% वस्तु व सेवा कर समाविष्ट करण्यात आला आहे.

ड) ई-चलान प्रकल्पासाठी संबधित कंपनीला सल्लागाराच्या मानधनापोटी जादा रक्कम अदा केली आहे असे निदर्शनास आल्यास सदर जादा रक्कम संबधित कंपनीकडून समायोजीत करण्याचा अधिकार शासनास राहील.

इ) सदर देयके आयकर व इतर प्रचलीत कर वजाती करून अदा करण्यात यावी.

२. प्रस्तुत प्रकरणी येणारा खर्च असलेल्या "२०५५ - पोलीस, (००) १०९, जिल्हा पोलीस, (००) (०१) जिल्हा पोलीस बल, १३, कार्यालयीन खर्च (२०५५ ०१६८)" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व तो सन २०२०-२०२१ या आर्थिक वर्षासाठी मंजूर अनुदानातुन भागविण्यात यावा.

३. कोषागारातून निधी आहरित करण्यासाठी अपर पोलीस महासंचालक वाहतुक, मुंबई यांना "नियंत्रक अधिकारी" व त्यांच्या अधिनस्त आहरण व संवितरण अधिका-याला "आहरण व संवितरण अधिकारी" म्हणून घोषित करण्यात येत आहे.

४. सदरहू शासन निर्णय वित्त विभाग अनौपचारिक संदर्भ क्र.३४२/२०/व्यय-७ दि.२१.०९.२०२० अन्वये दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२०१०२०१७०२५७१०२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Dinesh Appaji Saste

Digitally signed by Dinesh Appaji Saste
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=a49495d0d4b31e36ff1d612a85453ca984b74e28fd6f99cdf66e3e499969e942, cn=Dinesh Appaji Saste
Date: 2020.10.20 17:06:44 +05'30'

**( दिनेश सस्ते )**
**कार्यासन अधिकारी, गृह विभाग**

**प्रत : माहिती व योग्य त्या कार्यवाहीसाठी.**

१. प्रधान महालेखाकार (लेखा परीक्षा)-१, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२. पोलीस महासंचालक,महाराष्ट्र राज्य, मुंबई.
३. अपर पोलीस महासंचालक,वाहतुक,मुंबई.
४. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई / नागपूर.

५. विशेष पोलीस महानिरीक्षक,सायबर,मुंबई
६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
७. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
८. सहसंचालक, लेखा व कोषागारे, संगणक कक्ष,नवीन प्रशासकीय भवन,मंत्रालय, मुंबई.
९. कक्ष अधिकारी, व्यय-७ / वित्तीय सुधारणा-१, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०.मे. केपीएमजी ॲडव्हायझरी सर्व्हिसेस प्रा.लि , मुंबई.
११.अर्थसंकल्प शाखा, गृह विभाग, मंत्रालय मुंबई.
१२.निवड नस्ती / पोल-३.